**राज्यातील शेतकऱ्यांच्या आत्महत्या रोखण्यासाठी जिल्हा वार्षिक योजनेतून अवरुध्द पाण्यातील मत्स्यसंवर्धन या योजनेअंतर्गत विशेष कार्यक्रमांतर्गत विशेष सहाय्य तथा शेतकऱ्यांना पूरक जोडधंदा म्हणून शेततळयांमध्ये मत्स्यबीज/कोळंबी बीज संचयन कार्यक्रम राबविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्र.मत्स्यवि २०१५/प्र.क्र.१५०/पदुम-१३,**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक :- ३०/०७/२०१५

**<u>संदर्भ -</u>**: १) दि.१२.७.२०१५ च्या मंत्रिमंडळ बैठकीत घेण्यात आलेला निर्णय

२) शासन निर्णय,महसूल व वन विभाग, क्र. एससीवाय-२०१५/प्र.क्र.११९/म.७ (भाग-१), दि.२४ जुलै, २०१५.

**<u>प्रस्तावना -:</u>**

अवर्षणामुळे बाधित भागातील विशेषत: यवतमाळ व उस्मानाबाद जिल्हयातील शेतकऱ्यांकरीता विशेष मदतीचा कार्यक्रम पथदर्शी तत्वावर तयार करणे या विषयाचा एकत्रित प्रस्ताव मा.मंत्रिमंडळाच्या दि. १२.७.२०१५ च्या बैठकीत ठेवण्यात आलेला होता. सदर प्रस्तावामध्ये मत्स्यव्यवसायाशी संबंधीत असलेल्या शेततळयात मत्स्यबीज व कोळंबी संचयन कार्यक्रम राबविणे या योजनेचा समावेश होता. उपरोक्त बैठकीमध्ये प्रशासकीय विभागांच्या प्रस्तावांच्या अनुषंगाने मुद्यांमध्ये निश्चित धोरणानुसार विविध उपाय योजना यांना मान्यता, त्यांची प्रत्यक्ष अंमलबजावणी, त्यावरील संनियंत्रण, आवश्यक वित्तीय तरतूद, निधी उपलब्धता याबाबत प्रशासकीय कार्यवाही संबंधीत विभागाने करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आलेला आहे. तसेच राज्यातील शेतकऱ्यांच्या आत्महत्या रोखण्यासाठी विशेष मदतीचा कार्यक्रम राबविण्याबाबतच्या घेतलेल्या धोरणात्मक निर्णयानुसार शासनाच्या विविध विभागांनी राबवावयाच्या उपाययोजनांना संदर्भ क्र.२ येथील दि. २४.७.२०१५ च्या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आलेली आहे.

अवर्षण परिस्थितीमुळे बाधीत क्षेत्रातील शेतकऱ्यांच्या आत्महत्या विचारात घेऊन शेतकऱ्यांना शेती व्यतिरिक्त पूरक जोडधंदा उपलब्ध व्हावा यासाठी मत्स्यव्यवसायाच्या योजनांचे सादरीकरण मा.मुख्यमंत्री यांचेकडे दि.८ एप्रिल, २०१५ रोजी करण्यात आले होते. शेतकऱ्यांना शेतीसाठी वर्षभर पाणीपुरवठा व्हावा यासाठी कृषि विभागाकडून शेततळी बांधून देण्याची योजना राबविण्यात येते. या योजनेअंतर्गत निर्माण झालेल्या शेततळयांमध्ये जलद गतीने वाढणाऱ्या मत्स्यबीज/कोळंबी बीजाचे

संचयन करुन त्यापासून शेतकऱ्यांना माफक उत्पन्नाचे साधन उपलब्ध करुन देण्यासाठी विकास कार्यक्रमांतर्गत विशेष बाब म्हणून ही योजना राबविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय -:**

राज्यातील अवर्षणामुळे शेतकऱ्यांच्या होत असलेल्या आत्महत्या रोखण्यासाठी अवर्षणग्रस्त जिल्हयातील शेतकऱ्यांना कृषि विभागाने बांधून दिलेल्या शेततळयांमध्ये मत्स्यबीज व कोळंबी संचयन कार्यक्रम १०० टक्के अनुदान तत्वावर राबविण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

सदर योजनेची अंमलबजावणी व कार्यपध्दती पुढीलप्रमाणे राहील.

१) सदरची योजना अवर्षणामुळे बाधित झालेल्या मराठवाडा, अमरावती व नागपूर विभागातील जिल्हयांपुरतीच राबविण्यात यावी.

२) सदर योजना ३ विभागातील पुढीलप्रमाणे एकूण-१४ जिल्हयांमध्ये राबविण्यात यावी.
मराठवाडा विभाग - (८ जिल्हे):- औरंगाबाद, जालना, परभणी, नांदेड, बीड, हिंगोली, लातूर व उस्मानाबाद.
अमरावती विभाग - (५ जिल्हे) :-अमरावती, अकोला, वाशिम, बुलढाणा व यवतमाळ.
नागपूर विभाग - (१ जिल्हा):- वर्धा.

३) सदरची योजना कृषि विभागामार्फत बांधून दिलेल्या व मागील ३ वर्षात निर्माण झालेल्या शेततळयांमध्ये राबविण्यात यावी.

४) निकषानुसार निवड झालेल्या शेततळयांमध्ये १०० टक्के अनुदान तत्त्वावर प्रत्येक तळयात १००० मत्स्यबोटुकली व १००० कोळंबी बीज संचयन करण्यास अनुमती असेल.

५) निकषानुसार निवड झालेल्या लाभार्थी शेतकऱ्यांना मत्स्यबोटुकली व कोळंबी बीज खरेदीच्या अधिकृत कागदपत्रे सादर करणे संचयनाचा पुरावा सादर करणे आवश्यक राहील.

६) लाभार्थी शेतकऱ्यांने त्यांचे शेततळयात मत्स्यबोटुकली व कोळंबी बीज संचयन छायाचित्रण, करुन त्याबाबत केल्याची खात्री करण्याची जबाबदारी संबंधीत जिल्हयात सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांची राहील. सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी तसे प्रमाणित केल्यानंतर, अनुदान वितरीत करण्यात येईल.

७) अनुदानासाठी कमी दर रु.१/- प्रतिनग व कोळंबी बीज रु.२/- प्रति नग याप्रमाणे राहील व अनुदान प्रती शेततळी रु.१०००/- मत्स्यबोटुकली व रु.२०००/- कोळंबी बीज या मर्यादेत देण्यात येईल.

८) लाभार्थी निवडीचे निकष खालीलप्रमाणे राहतील.

२.१ लाभार्थी शेततळी जमिनीबाबत ७/१२ जोडणे आवश्यक आहे. ७/१२ उताऱ्यात कृषि खात्याकडून अनुदानित/बिगर अनुदानित शेततळयांना असणे आवश्यक आहे.

२.२ लाभार्थी शेतकऱ्यांच्या निवडीत अल्प व अत्यल्प भूधारकांना व ज्या शेतकऱ्यांचा शेतीव्यतिरिक्त इतर कोणताही जोडधंदा नाही, अशांना प्राधान्य देण्यात यावे.

२.३ किमान ८ महिने पुरेसे पाणी राहील असे शेततळे या योजनेसाठी पात्र राहील.

२.४ लाभार्थी शेतकरी १८ ते ६० वयोगटातील असावा.

२.५ अनुदान मागणीचा अर्ज संबंधित जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांचेकडे सादर करण्यात यावा.

२.६ शेततळयांच्या निवडीनुसार आवश्यक मत्स्यबोटुकली व कोळंबी बीज उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी मत्स्यव्यवसाय विभागाची राहील.

२.७ मत्स्यबोटुकली व कोळंबी बीज संचयनाची नोंद संबंधीत जिल्हयाचे सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय ठेवतील व प्रादेशिक उपआयुक्त मत्स्यव्यवसाय हे या योजनेचे सनियंत्रण करतील.

२.८ जिल्हयातील शेततळयामध्ये या योजनेअंतर्गत करण्यात येणारे मत्स्यबोटुकली व कोळंबी बीज संचयन याचा एकत्रित अहवाल संबंधित सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी जिल्हाधिकारी व आयुक्त मत्स्यव्यवसाय यांना सादर करावा.

२.९ या योजनेची फलनिष्पती मत्स्य तळयातून मिळालेले मत्स्योत्पादन व आर्थिक उत्पन्न याची माहिती संबंधित सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय यांनी घेऊन त्याची दप्तरी नोंद ठेवावी.

२.१० सर्वेक्षण करुन लाभार्थी निवडीचे अधिकार संबंधीत जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांचे अध्यक्षतेखालील कमिटीला राहतील सदर समिती स्वरुप खालीलप्रमाणे.

| | | |
|---|---|---|
| १. | जिल्हाधिकारी | अध्यक्ष |
| २. | संबंधीत तालुकाचे तहसीलदार | सदस्य |
| ३. | कृषी अधिकारी | सदस्य |
| ४. | सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय (तांत्रिक) | सदस्य सचिव |

निकषाप्रमाणे पात्र ठरलेले व मत्स्यबोटुकली व कोळंबी बीज संचयन करुन अनुदान देण्यात आलेले तलाव व लाभार्थींना पुन्हा या कार्यक्रमासाठी अनुदान देता येणार नाही. सदर योजनेअंतर्गत करण्यात येणाऱ्या संचयनाचे विहीत नमुन्यात अभिलेख ठेवण्यात यावेत.

वार्षिक विकास कार्यक्रमांतर्गत जिल्हा नियोजन विकास समित्यांमार्फत अवरुध्द पाण्यातील मत्स्यसंवर्धन या जिल्हास्तरीय योजनेत २४०५ मत्स्यव्यवसाय या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या नियतव्ययातील तरतूद अर्थसंकल्पीत करुन या योजनेचा खर्च भागविण्यात यावा. सदरची योजना पथदर्शी प्रकल्प म्हणून राबविण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१५०७३११६५७१२६३०१ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Nitin Madhavrao Pawar

Digitally signed by Nitin Madhavrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=79d1142b510b75c1201d04efa5ba4e48e243bd2014663c505a44a97e90266500, cn=Nitin Madhavrao Pawar
Date: 2015.07.31 17:00:43 +05'30'

**( नितिन पवार )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा/परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई /२, नागपूर, महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
३) मा.मंत्री (कृषी व पदुम) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय मुंबई
४) मा.मंत्री,(मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
५) अप्पर मुख्य सचिव (कृषि विभाग), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान सचिव (वित्त), मंत्रालय, मुंबई.
७) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) सचिव (पदुम),कृषी व पदुम विभाग मंत्रालय मुंबई

९) सचिव,(मदत व पुनर्वसन),महसूल व वन विभाग,मंत्रालय,मुंबई

१०) आयुक्त मत्स्यव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

११) विभागीय आयुक्त, सर्व.

१२) जिल्हाधिकारी,सर्व

१३) कृषी अधिकारी सर्व

१४) तहसिलदार सर्व

१५) सर्व संबंधीत कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम,

१६) प्रादेशिक उपआयुक्त मत्स्यव्यवसाय, सर्व

१७) सहाय्यक आयुक्त मत्स्यव्यवसाय, सर्व

१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

१९) सर्व कोषागार अधिकारी.

२०) निवड/नस्ती.